केंद्र शासनाकडून राज्यास भांडवली गुंतवणूकीसाठी कर्ज स्वरुपात विशेष सहाय्य योजना भाग-१ अंतर्गत (बिनव्याजी कर्ज) महावितरण कंपनीला रु. १०२.०० कोटी निधी रोखीने वितरित करणेबाबत सन २०२४-२५ के-११ (लेखाशिर्ष-६८०१०७१८)

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा ,कामगार व खनिकर्म विभाग,
शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६८/ऊर्जा-३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-१२ फेब्रुवारी,२०२५.

संदर्भ:-

१. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.११२/ऊर्जा-३, दि.१६/११/२०२२.
२. भारत सरकार,वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.no.४४(१))/PF-S/२०२४-२५ (CAPEX), दि.२६/०२/२०२४.
३. शासन पत्र वित्त विभाग क्र. संकीर्ण -२०२४/प्र.क्र.१८/अर्थबळ, दि.०५/०६/२०२४.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५/०७/२०२४.
५. भारत सरकार,वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.no.४४(१))/PF-S/२०२४-२५ (CAPEX), दि.१४/१०/२०२४.
६. शासन पत्र, वित्त विभाग क्रमांक: संकिर्ण-२०२४/प्र.क्र.१८/अर्थबळ, दि.२९/१०/२०२४.
७. वित्त विभागाची दि.१०/०२/२०२५ रोजीची टिप्पणी.
८.उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६८/ऊर्जा-३,दि.१८/१२/२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत ५० वर्ष मुदतीचे बिनव्याजी कर्ज उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजनेंतर्गत सन २०२४-२५करिता लेखाशिर्ष ६८०१०७१८ खाली ऊर्जा विभागाकरिता रु.१०००.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. केंद्र शासनाने राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजना सन २०२४-२५ अंतर्गत भाग-१ करिता ऊर्जा विभागाच्या एक प्रकल्पाकरिता रु.३००.०० कोटी बिनव्याजी कर्ज मंजूर केले आहे.

२. सदर मंजूर रु.३००.०० कोटी निधीपैकी वित्त विभागाच्या मान्यतेने उपरोक्त संदर्भिय शासन निर्णय क्र.०७ अनव्ये रु.१९८.०० कोटी निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्यात आला आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भिय शासन परिपत्रक क्र.०३ मधील सुचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार केंद्र शासनाने राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजना सन २०२४-२५ अंतर्गत भाग-१ करिता मंजूर केलेल्या रु.३००.००कोटीपैकी उर्वरित रु.१०२.०० कोटी बिनव्याजी कर्ज रक्कम महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-१ खाली सन २०२४-२०२५ मध्ये मंजूर तरतूद रु.३००.०० कोटी मधून महावितरण कंपनीकडील खालील नमूद प्रकल्पांकरिता **रु.१०२.०० कोटी (रुपये एकशे दोन कोटी फक्त)** इतकी बिनव्याजी कर्ज रक्कम खालील प्रकल्पाला रोखीने वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

(रु. कोटी)

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्पाचे स्वरुप | मंजूर निधी | आतापर्यंत वितरित निधी | वितरीत करावयाची रक्कम | अंमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी प्रणाली मजबूतीकरण योजना २.० | चालु प्रकल्प | ३००.०० | १९८.०० | १०२.०० | महावितरण |
| | | **एकूण** | **३००.००** | **१९८.००** | **१०२.००** | |

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र. के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, (००),(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमांना कर्जे, (०१) केंद्रशासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्जे (केंद्र हिस्सा १००%), (००) (०१) महानिर्मिती, महापारेषण आणि महावितरण कंपनीच्या पायाभूत प्रकल्पासाठी बिनव्याजी कर्ज (योजना भाग-१) (६८०१०७१८)(कार्यक्रम) ५५,कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त लेखाशिर्षाखालील निधी आहरित करण्यासाठी ऊर्जा विभागाचे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून श्रीमती अंकिता बो-हाडे,कक्ष अधिकारी (ऊर्जा-३) आणि "नियंत्रण अधिकारी" म्हणून श्री. ना. श्री. कराड, सह सचिव, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे.

४. सदर योजनांचे अंमलबजावणीसाठी प्रशासकीय विभाग स्तरावर State Scheme Manager (SSM) म्हणून,सह सचिव (ऊर्जा-३),उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग यांची निवड केली असून ते सदर योजनेचे Single Nodal Agency (SNA) म्हणून काम पाहतील.तसेच First Level Agency म्हणून कक्ष अधिकारी (ऊर्जा-३),उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग हे काम पाहतील.

५. सदर निधी आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे देयके सादर करुन प्राप्त निधी महावितरण कंपनी, वांन्द्रे पुर्व, मुंबई-५१ यांना देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही "ऊर्जा-३" कार्यासनाने करावी.

६. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेअंतर्गत भाग १- खाली प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमांसाठी महावितरण कंपनीने महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावेत.

७. केंद्र शासनाने भांडवली गुंतवणूकीकरिता ज्या प्रकल्पांसाठी निधी मंजूर केला आहे,त्याच प्रकल्पासाठी व त्यातील प्रयोजनासाठीच निधी खर्च होईल, याची महावितरण कंपनी यांनी खबरदारी घ्यावी व अशा खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

८. सदर योजनेच्या भाग-१ खाली केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज "००४९ व्याजाच्या जमा रक्कमा, १९० सार्वजनिक क्षेत्र व उतर उपक्रम यांजकडून व्याज,(०१) (०३)

महाराष्ट्र राज्य वीज मंडळाला दिलेल्या कर्जावरील व्याज, ००४९०७३१” या लेखाशीर्षाखाली राज्य शासनाकडे तातडीने जमा करावे व भरणा केलेला रकमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

९. केंद्र शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर बिनव्याजी कर्जासाठी केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधित अटी व शर्ती लागू राहतील. सदर बिनव्याजी कर्ज रक्कम वितरणासाठी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५/०७/२०२४ रोजीच्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील संबंधित सर्व अटीची पूर्तता होत आहे.

१०. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की,सदर देयक सशर्थ असून या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि.१०/०२/२०२५ रोजीच्या टिप्पणी व वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५/०७/२०२४ रोजीच्या परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०२१२११४६०४३८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2025.02.12 11:47:33 +05'30'

**(ना. श्री. कराड)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा,सभापती/उपसभापती विधानपरिषद,यांचे सचिव.
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण) ,यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मंत्री अपारंपारिक ऊर्जा,यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई-३२.
७. मा. राज्यमंत्री ऊर्जा, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
१०. सर्व विधानसभा/विधानसभा सदस्य.
११. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२
१३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२
१४. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.-३२
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधारी कंपनी मर्या., मुंबई,
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,

१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
१८. महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२०. अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
२१. अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
२२. कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२३. वित्त विभाग/(अर्थबळ/अर्थसंकल्प-३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
२४. निवड नस्ती, ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.